संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयाकरिता शासनाच्या ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलवरुन नवीन झेरॉक्स मशीन खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**क्र.सीडीएम-२०२४/प्र.क्र.१२२/विशा-८,**

**दिनांक : ०३ मार्च, २०२५.**

१२ वा मजला, नविन प्रशासकीय भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०००३२

वाचा :- संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.नासंस/कार्या-६/५/ झे.म.ख./२०२४/११५४, दि.०३.१२.२०२४.

प्रस्तावना :-

संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी दि.०३.१२.२०२४ च्या पत्रान्वये, नागरी संरक्षण संचालनालयासाठी व संचालनालयाच्या अधिपत्याखालील कार्यालयांकरीता नवीन विद्युत फोटो कॉपी यंत्र (झेरॉक्स मशिन) खरेदीस व यासाठी होणाऱ्या खर्चास मान्यता देण्याची विनंती केली आहे. संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

शासन निर्णय :-

नागरी संरक्षण संचालनालय व संचालनालयाच्या अधिपत्याखाली असणाऱ्या १) राज्य फिरते नागरी आणीबाणी सेनास्तंभ, मुंबई, २) अतिरिक्त नियंत्रक, नागरी संरक्षण, बृहन्मुंबई, ३) समादेशक, नागरी संरक्षण प्रशिक्षण महाविद्यालय, मुंबई, ४) उपनियंत्रक, नागरी संरक्षण, ठाणे या कार्यालयांकरीता शासनाच्या ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलवरुन नवीन झेरॉक्स मशीन खरेदी करण्यासाठी रु.९,१२,३९५/- (रुपये नऊ लक्ष बारा हजार तीनशे पंच्यान्नव फक्त) इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर खरेदीसाठीचा खर्च मागणी क्र.बी-१, मुख्य लेखाशीर्ष २०७०- इतर प्रशासनिक सेवा, १०६-नागरी संरक्षण (०३) राज्य नागरी संरक्षण संघटना (२०७० ०२६३) “१३-कार्यालयीन खर्च” या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानामधून भागविण्यात यावा.

०३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.२६-अ, नियम क्र.७६ नुसार मंत्रालयीन प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०३११५६४६९१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

MINAKSHI
DEVIDAS
KARHADE

Digitally signed by MINAKSHI DEVIDAS KARHADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=33473ccf07d654375a0e6116507991330653707 09cb518c396a6b2b3f6c3cda9, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=64757C0F2E9C5E56362BC8E7A79ABEE993C28EBD3D21BC22D37A4D8E12AD1CB3, cn=MINAKSHI DEVIDAS KARHADE
Date: 2025.03.03 11:57:40 +05'30'

**( मिनाक्षी कऱ्हाडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
३. महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षक अधिकारी, मुंबई
६. निवड नस्ती (विशा-८)